आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ करीता शासकीय वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) लेखाशीर्ष (४२२५ १०९२ ) या अंतर्गत निधी वितरण आदेश..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.११२ /कार्यासन.६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.व दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.

२) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय समक्रमांक दि.०४.०८.२०२३,दि.०२.११.२०२३, दि.०४.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.

३) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र.शाआबां-२०२३/प्र.क्र.१६८/का-१३

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या वर्षाकरीता मागणी क्रमांक टी-६ मुख्य लेखाशिर्ष ४२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०२) (०५) वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) (४२२५ १०९२), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज वितरण प्रणालीवर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-६ मधील शासकीय वसतीगृह बांधकाम (ओटिएसपी) (४२२५ १०९२), ५३- मोठी बांधकामे या खाली सन २०२३-२४ या वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध्द करुन दिलेला **रु.३४०९.०० लाख (अक्षरी रुपये चौतीस कोटी नऊ लाख फक्त)** इतका निधी खालीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, (आदिवासी विकास) सा.बां मंडळ, नाशिक/नागपुर यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र | नियंत्रक अधिकारी | कामांची संख्या | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता (आदिवासी विकास), सा.बां मंडळ, नाशिक | १८ | २६८०.०० |
| २ | अधीक्षक अभियंता (आदिवासी विकास), सा.बां मंडळ, नागपुर. | ७ | ७२९.०० |
| **एकुण** | | **२५** | **३४०९.००** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS )वर वितरीत करण्यात येत असुन सदर निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद एकूण २५ **कामांवर** रकाना **४** मध्ये नमुद केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३. सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी अर्थसंकल्पीय प्रकाशन परिशिष्ट -ड मध्ये समाविष्ट असलेल्या कामांवरच खर्च करण्याबाबत तसेच प्रशासकीय मान्यतेच्या/सुधारित प्रशासकीय मर्यादेतच खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या २५ कामांवरच सदरील निधी खर्च होईल याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी व अधिक्षक अभियंता यांची राहील.

३) अधीक्षक अभियंता (आदिवासी विकास), सा.बां मंडळ, **नाशिक/नागपुर** यांचे मार्फत सदर बांधकामांना वेळोवेळी भेटी देण्यात येवून कामाचा दर्जा, गुणवत्ता यांची तपासणी करावी व वितरीत करण्यात आलेला निधी योग्य रित्या खर्च होत आहे याची दक्षता घ्यावी.

४) कार्यकारी अभियंता (आदिवासी विकास), सा.बां.विभाग, नाशिक, ठाणे,अमरावती यांनी अधीक्षक अभियंता (आदिवासी विकास), सा.बां मंडळ, यांचेमार्फत सादर केलेल्या मागणीस अनुसरुन निधी वितरीत करण्यात येत असुन सदर निधी दि.३१.०३.२०२४ पुर्वी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

५) सदर वितरीत निधीमधुन झालेल्या खर्चाचा अहवाल नियंत्रक अधिकारी यांनी एकत्रित करुन तो विहित प्रपत्रात शासनास सादर करावा.

६) वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित शासन परिपत्रकामधील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.४०८/२०२४ व्यय-१४ यांनी दि.३०.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ मधील परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१८२३३९९४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.31 11:15:04 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई.
२. सचिव,आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपुर/अमरावती/ठाणे/नाशिक.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र, महाराष्ट्र.
७. अधीक्षक अभियंता (आदिवासी विकास), सा.बां मंडळ, नागपुर/नाशिक.
८. कार्यकारी अभियंता, (आदिवासी विकास), सा.बां विभाग नाशिक/ठाणे/अमरावती/चंद्रपूर.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/धुळे/नाशिक/नंदुरबार/अमरावती/नागपुर/चंद्रपुर.
१३. वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन -५, आदिवासी विकास मंत्रालय,मुंबई-३२
१६.निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/ प्र.क्र.११२/कार्यासन.६, दि. ३१ मार्च,२०२४ सोबतचे विवरणपत्र. | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु.लाखात) |
| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| | कार्यकारी अभियंता, नाशिक (सार्व. बांधकाम आदिवासी विभाग) | | |
| १ | नकाणे ता. जि. धुळे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे (बाब क्र. १ पृष्ठ क्र.७०४) | १४८४.२२ | १००.०० |
| २ | मौजे महंमदवाडी हडपसर पुणे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे (बाब क्र. २ पृष्ठ क्र.७०४) | ४४८५.०० | ४००.०० |
| ३ | दोंडाईचा जि. धुळे येथे आदिवासी मुलींचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | १०१७.८२ | ३५०.०० |
| ४ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे साक्री ता. साक्री जि. धुळे | ११७०.५१ | २००.०० |
| ५ | शासकीय आदिवासी मुलांचे वसतीगृह बांधकाम करणे साक्री ता. साक्री जि. धुळे | ११८०.६३ | ३५०.०० |
| ६ | शासकीय आदिवासी मुलांचे वसतीगृह बांधकाम करणे हसनापुर लोणी ता. राहता जि. अहमदनर | १३१६.३७ | २००.०० |
| ७ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर, परिसरातील मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | ७७५९.७९ | ३००.०० |
| ८ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर, परिसरातील मुलींचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम करणे | ३९२९.५९ | १५०.०० |
| ९ | शासकीय आदिवासी मुलांचे वसतीगृह इमारत बांधकाम करणे ता. सटाणा जि. नाशिक (क्षमता २५०) | १२१४.७९ | २०.०० |
| १० | लोणखेडा येथे शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करणे. ता. शहादा जि. नंदुरबार | ९१९.२३ | २०.०० |
| ११ | निफाड येथे शासकीय आदिवासी मुलींचे वसतीगृह G+३) बांधकाम करणे. ता. निफाड, जि. नाशिक | १२३३.८० | २०.०० |
| १२ | निफाड येथे शासकीय आदिवासी मुलांचे वसतीगृह G+३) बांधकाम करणे. ता. निफाड, जि. नाशिक | १२३३.८० | २०.०० |

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/ प्र.क्र.११२/कार्यासन.६, दि. ३१ मार्च,२०२४ सोबतचे विवरणपत्र. | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु.लाखात) |
| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| **१२** | **एकुण नाशिक (आदिवासी विभाग)** | **२६९४५.५५** | **२१३०.००** |
| **कार्यकारी अभियंता, ठाणे (सार्व. बांधकाम आदिवासी विभाग)** | | | |
| १ | मिरा-भाईंदर जि.ठाणे येथे आदिवासी मुलांसाठी शासकीय वसतिगृह इमारत बांधकाम करणे. | २०२१.०३ | १००.०० |
| २ | आदिवासी मुलींचे शासकीय वसतिगृह सोलापूर ता सोलापूर जी. सोलापूर येथे ( G +३) इमारत बांधकाम करणे | ११५४.८६ | ७०.०० |
| ३ | ठाणे ता. जि. ठाणे लोढा कॉम्पलेक्स भाईंदरपाडा येथील आदिवासी मुलींची शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम क्षमता (५०० जी+६) | १४६५.८८ | ४०.०० |
| ४ | सुधागड (पाली) ता.सुधागड जि. रायगड येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम इमारत. | १२५०.०० | १००.०० |
| ५ | पाली ( सुधागड ) येथे मुलींच्या वसतिगृहाचे बांधकाम करणे. ता.सुधागड , जि. रायगड. | ८१८.०८ | १५०.०० |
| ६ | बारव ता. जुन्नर जि. पुणे येथे आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकाम (BOYS HOSTEL. G +२ ) | ९५७.१८ | ९०.०० |
| **६** | **एकुण ठाणे (आदिवासी विभाग)** | **७६६७.०३** | **५५०.००** |
| **१८** | **अ) एकुण अधिक्षक अभियंता,नाशिक (सार्व.बांधकाम आदिवासी मंडळ)** | **३४६१२.५८** | **२६८०.००** |
| **कार्यकारी अभियंता, अमरावती (सार्व.बांधकाम आदिवासी विभाग)** | | | |
| १ | शा.मुलींचे वसतीगृह कोलवड ता/जि.बुलढाणा (बाब क्र.६ पृ.क्र.८) | ८२५.४६ | ९४.०० |
| २ | शा.मुलींचे वसतीगृह क्र.२ हिंगोली जि.हिंगोली | १०७३.०४ | १५०.०० |
| ३ | शा.मुलींचे वसतीगृह कळमनूरी जि.हिंगोली येथील दुसऱ्या मजला चे बांधकाम (बाब क्र.९ पृ.क्र.८) | २९६.२८ | ५०.०० |
| ४ | शा.मुलांचे वसतीगृह मोर्शी ता.मोर्शी जि.अमरावती चे बांधकाम करणे | ८३५.१३ | ७५.०० |
| ५ | शासकीय मुलांचे वसतीगृह आर्णी ता.आर्णी जि.यवतमाळ चे बांधकाम करणे | ८३५.४२ | ८०.०० |

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/ प्र.क्र.११२/कार्यासन.६, दि. ३१ मार्च,२०२४ सोबतचे विवरणपत्र. | | | |
|---|---|---|---|
| | | | (रु.लाखात) |
| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| ६ | शासकीय मुलीचे वसतीगृह नांदेड ता.जि.नांदेड (जी+२) चे बांधकाम करणे | ९४५.४८ | १३०.०० |
| ६ | **एकुण अमरावती (आदिवासी विभाग)** | **४८१०.८१** | **५७९.००** |
| **कार्यकारी अभियंता,चंद्रपुर (सार्व.बांधकाम आदिवासी विभाग)** | | | |
| १ | भंडारा जिल्ह्यातील पवनी तालुक्यात मुलींचे वसतीगृहाचे बांधकाम करणे. | ९१०.०० | १५०.०० |
| १ | **एकुण चंद्रपुर (आदिवासी विभाग)** | **९१०.००** | **१५०.००** |
| **७** | **ब) अधिक्षक अभियंता, नागपुर (सार्व.बांधकाम आदिवासी मंडळ)** | **५७२०.८१** | **७२९.००** |
| **२५** | **एकुण अ)+ब)** | **४०३३३.३९** | **३४०९.००** |